शासकीय गोदाम दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत. मौ.तळणी ता.औंढा ना. जि.हिंगोली. (सन २०२०-२१)

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदादु-१११९/प्र.क्र.९४/नापु-१६-ब**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: - ०३ नोव्हेंबर, २०२०.

**वाचा :-**

१. जिल्हाधिकारी, हिंगोली यांचे पत्र क्र.२०१९/पुरवठा/गो.दुरुस्ती तळणी/प्र.क्र./ कावि. ३२९, दि.२०.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत राज्यातील शिधापत्रिका धारकांना जीवनावश्यक वस्तूंचे वितरण करण्यात येते. भारतीय अन्न महामंडळाकडून प्राप्त होणाऱ्या अन्नधान्याची साठवणूक राज्य शासनाच्या गोदामामध्ये केली जाते. हिंगोली जिल्हयातील मौ.तळणी ता.औंढा ना. येथील नवीन गोदाम बांधकामांचे टिन शेड (डोम) हे वादळी वाऱ्यामुळे गोदामाच्या आत पूर्णपणे दबून पडले आहे. सदर गोदाम नाबार्ड अंतर्गत नवीन बांधलेले असून माहे फेब्रुवारी, २०१७ पासून गोदामात अन्नधान्याची साठवणूक करण्यात येत आहे. सद्यस्थितीत औंढा ना. तालुक्यात केवळ ६०० मे.टन क्षमतेचे एक गोदाम वापरात आहे. त्यामुळे धान्य साठवणूक करणे कठीण होत आहे. त्यामुळे गोदामाची दुरुस्ती होणे आवश्यक असल्याने सदर गोदाम दुरुस्तीचे अंदाजपत्रक जिल्हाधिकारी, हिंगोली यांनी दि.२०.०९.२०१९ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केले आहे. मौ.तळणी ता.औढा ना. येथील गोदाम नैसर्गिक आपत्तीमध्ये नादुरुस्त झालेले असल्यामुळे या गोदाम दुरुस्ती प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

२. हिंगोली जिल्हयातील मौ.तळणी ता. औढा ना. येथील शासकीय गोदाम दुरूस्तीच्या कामास व अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीनतेने प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

i. गोदामाचा नकाशा, संकल्पन व साईट प्लॅनसक्षम अधिकाऱ्यांकडून मंजूर करुन घेतल्याशिवाय कामाला सुरुवात करु नये.

ii. प्रथमत: सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम अधिकाऱ्यांकडून अंदाजपत्रके साक्षांकित करुन घ्यावीत.

iii. दुरूस्तीस विलंब किंवा इतर कारणांनी गोदाम दुरूस्तीस वाढीव खर्च होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

iv. अंदाजपत्रकातील दुरुस्ती कामाच्या आवश्यकतेबाबत जिल्हा पुरवठा अधिकारी , हिंगोली यांनी प्रथमत: खात्री करावी व तद्‌नंतरच काम हाती घ्यावे.

३. मौ.तळणी ता.औंढा ना. जि.हिंगोली येथील गोदाम नैसर्गिक आपत्तीमध्ये नादुरुस्त झालेले असल्यामुळे दुरुस्ती प्राथम्याने होणे आवश्यक आहे. त्यामुळे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन पत्र दि.२५.०९.२०१९ नुसार मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांची तांत्रिक सहमती घेण्याच्या अटीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. यास्तव मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांची तांत्रिक सहमती घेण्यात यावी.

**४. गोदाम दुरुस्ती पुढीलप्रमाणे :-**

| अ.क्र. | जिल्हा | तालुका | गोदामाचे नाव | कामाचे सर्वसाधारण स्वरुप | अंदाजित खर्च (रुपये) |
|---|---|---|---|---|---|
| १. | हिंगोली | औढा ना. | मौ. तळणी | एम-२० मध्ये कॉलम व बीम करणे, आतील व बाहेरील बाजूस प्लास्टर करणे, आतील व बाहेरील बाजूस रंगरंगोटी करणे, नवीन प्रोफलेक्स शिट बसविणे इ. अंदाजपत्रकाप्रमाणे. | ४७,०८,८००/- |
| **अक्षरी रुपये:- सत्तेचाळीस लक्ष आठ हजार आठशे फक्त** | | | | | |

५. वरीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या शासकीय गोदाम दुरूस्तीकरीता निधी उपलब्ध झाल्यांनतर त्याप्रमाणे दुरूस्तीची कामे करण्यात यावी. निधी प्राप्त झाल्यानंतर शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे तातडीने सुरू करण्यात येऊन पूर्ण करण्यात यावीत. गोदाम दुरूस्ती सुरू

झाल्यांनतर प्रथम दुरूस्तीचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित दुरूस्तीचा दरमहा आढावा घेऊन दुरूस्तीची प्रगती जिल्हा पुरवठा अधिकारी, हिंगोली यांनी शासनास सादर करावा.

६. सदरील गोदाम दुरूस्तीची कामे सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावीत. त्याकरीता आवश्यक निधी सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करून देण्यात येईल.

७. सदरील शासकीय गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी.

८. प्रशासकीय मान्यतेच्या आदेशात कामाचे संक्षिप्त स्वरूप नमूद करण्यात आलेले असून प्रत्यक्षात गोदाम दुरूस्तीची कामे शासनास सादर केलेल्या दुरूस्ती कामांच्या अंदाजपत्रकानुसारच पूर्ण करण्यात यावीत. म्हणजेच शासनास सादर केलेल्या अंदाजपत्रकात समाविष्ट बाबीनुसार गोदाम दुरूस्तीची कामे पूर्ण करण्यात यावीत.

९. गोदाम दुरूस्तीच्या कामातील अनावश्यक पुनरूक्ती टाळण्याच्या दृष्टीने सदरहू आदेशात नमूद गोदाम दुरूस्तीच्या कामाच्या आवश्यकतेबाबत जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांनी व्यक्तिशः छाननी करावी. गोदाम दुरूस्तीच्या कामातील पुनरूक्ती अथवा विसंगतीबाबत शासनास अवगत करावे. यासंदर्भात पुढील शासन आदेशापर्यंत कार्यवाही स्थगित करावी.

१०. सदर जिल्हयातील वर नमूद गोदाम दुरूस्तीच्या कामास या अगोदर प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली नाही याची खातरजमा जिल्हा पुरवठा अधिकारी, हिंगोली यांनी करावी.

११. सदरील कामावरील खर्च सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी उपलब्ध अनुदानातुन करण्यात येईल. सदर गोदामाच्या दुरूस्तीवरील खर्च "मागणी क्रमांक एम-०२, लेखाशिर्ष २४०८ अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च , ०१, अन्न १०१, प्रापण व पुरवठा (०३), प्रापण वितरण व किंमत वितरण ०३, ०२ ( मुफसल ) २४०८ ०१०८ २७ लहान बांधकामे" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

१२. सदर गोदामाच्या दुरूस्तीचे काम पूर्ण झाल्यानंतर सदरचे काम हे मंजूर अंदाजपत्रकाप्रमाणे उत्कृष्ट झाल्याबाबतची खातरजमा संबंधीत कार्यकारी अंभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी संयुक्तरित्या करून तसा स्थळ निरिक्षण अहवाल तयार करावा व तो अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

१३. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या भाग पहिला उप विभाग-पाच मधील अनुक्रमांक १० नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ नुसार प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०११०४१५११३३९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manojkumar Manikrao Suryawanshi

Digitally signed by Manojkumar Manikrao Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supply and Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f01fe9e39ec840cfd8aff420acfb85645316150fbe47d78667d211a870b6cad, serialNumber=171d531e2df977f0515a96704f71cb7e1b7622eae8ceb5547f27f39b9cdd96b0, cn=Manojkumar Manikrao Suryawanshi
Date: 2020.11.04 15:14:46 +05'30'

**( मनोजकुमार सूर्यवंशी )**

सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. उप आयुक्त (पुरवठा), औरंगाबाद.
२. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
३. जिल्हाधिकारी, हिंगोली.
४. जिल्हा पुरवठा अधिकारी, हिंगोली.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, हिंगोली.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली.
७. महालेखापाल (लेखा परीक्षा) १/२, मुंबई/नागपूर.
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, मुंबई/नागपूर.
९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
१०. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय व अर्थसंकल्प-३), मंत्रालय, मुंबई.
११. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती/नापु-१६ ब.